सुधारित वेतनश्रेणीच्या कमाल वेतनावर कुंठीत झालेल्या कर्मचाऱ्यांना मंजूर झालेल्या कुंठीत वेतनवाढी पदोन्नतीच्या पदांवर वेतननिश्चिती करताना विचारात घेणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय, क्र. वेतन-१०९०/प्र.क्र. २२/९४/सेवा-३,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १२ सप्टेंबर १९९४

वाचा : (१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक वेपूर-१२८८/५७९/सेवा-१०, दिनांक १४ ऑक्टोबर १९८८.
(२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक वेपूर-१२८९/१३२/सेवा-१०, दिनांक १५ सप्टेंबर १९८९.
(३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक वेतन-१०९०/प्र.क्र. ७८/९०/सेवा-३, दिनांक ३ डिसेंबर १९९०.

**शासन निर्णय**

चौथ्या केंद्रीय वेतन आयोगाने जे केंद्रीय कर्मचारी त्यांच्या वेतनश्रेणीच्या कमाल वेतनावर कुंठीत होतील परंतु ज्यांच्या वेतनश्रेणीच्या कमाल मर्यादा रु. ६,७०० पेक्षा अधिक नाही अशा कर्मचाऱ्यांना कमाल ३ वेतनोत्तर वेतनवाढी मंजूर करण्याची शिफारस केली. केंद्रीय वेतन आयोगाच्या सदर शिफारशीनुसार राज्य शासनानेही सुधारित वेतनश्रेणीच्या कमाल वेतनावर कुंठीत झालेल्या परंतु ज्यांच्या वेतनश्रेणीची कमाल मर्यादा रु. ६,७०० पेक्षा अधिक नाही अशा कर्मचाऱ्यांना कमाल वेतनावर दर दोन वर्षे पूर्ण केल्यानंतर एक अशा कमाल तीन वेतनोत्तर वेतनवाढी मंजूर करण्याचे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १४ ऑक्टोबर १९८८ अन्वये निर्गमित केले. त्यातील परि. २ नुसार कुंठीत वेतनवाढी वैयक्तिक वेतन समजण्यात येते व परि. ३ नुसार सदर वैयक्तिक वेतन नेहमीच्या नियमाखाली अनुज्ञेय असलेल्या सर्व प्रयोजनासाठी जसे कामावर असताना/बदली झाल्यानंतर प्रवासाचा रेल्वेचा वर्ग ठरविण्यासाठी विचारात घेतले जात होते. परंतु वरच्या पदावर पदोन्नती झाल्यानंतर करावयाच्या वेतननिश्चितीसाठी विचारात घेतले जात नव्हते. आता केंद्र शासनाने आपल्या, दिनांक ३१ मार्च १९९४ च्या आदेशान्वये पदोन्नतीच्या पदाच्या वेतननिश्चितीसाठी दिनांक ३० सप्टेंबर १९९३ पासून अशा कुंठीत वेतनवाढी विचारात घेण्याचा निर्णय घेतला आहे.

२. केंद्र शासनाच्या उपरोक्त आदेशास अनुलक्षून राज्य शासकीय कर्मचाऱ्यांनाही कुंठीत वेतनवाढीचा लाभ पदोन्नतीच्या पदावरील वेतननिश्चितीसाठी देण्याचा प्रश्न काही काळ शासनाच्या विचाराधीन होता. शासन आता असा आदेश देत आहे की, जे राज्य शासकीय कर्मचारी कुंठीत वेतनवाढी मिळून वरच्या पदावर पदोन्नत झालेले आहेत/होतील त्यांच्या पदोन्नतीच्या पदाची वेतनपुनर्निश्चिती कुंठीत वेतनवाढी विचारात घेऊन करण्यात यावी. तथापि, ह्या आदेशाची अंमलबजावणी दिनांक ३० सप्टेंबर १९९३ पासून करण्यात येईल. जे राज्य शासकीय कर्मचारी/अधिकारी दिनांक ३० सप्टेंबर १९९३ पूर्वी कुंठीत वेतनवाढी मिळाल्यानंतर पदोन्नत झालेले आहेत, त्यांनी दिनांक ३० सप्टेंबर १९९३ पासून कुंठीत वेतनवाढी विचारात घेऊन पदोन्नतीच्या पदाची वेतननिश्चिती करावी असा विकल्प देणे आवश्यक राहील. तसेच जे कर्मचारी/अधिकारी दिनांक ३० सप्टेंबर १९९३ किंवा त्यानंतर आणि ह्या आदेश निर्गमित होण्याच्या दिनांकापर्यंत कुंठीत वेतनवाढी मिळून पदोन्नत झालेले आहेत त्यांनीही वरीलप्रमाणे विकल्प देणे आवश्यक राहील. या शासन निर्णयाला विकल्पाचा नमुना जोडला आहे. सदर कर्मचाऱ्यांनी/अधिकाऱ्यांनी हे आदेश निर्गमित होण्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत आपला विकल्प द्यावा.

३. सर्व कार्यालय प्रमुख/विभाग प्रमुख/प्रशासकीय विभाग प्रमुख याना विनंती करण्यात येत आहे की, त्यांनी ह्या आदेशामधील वेतननिश्चितीच्या तरतुदी आपल्या अधिकार क्षेत्रातील ज्याना विकल्प देणे आवश्यक आहे अशा कर्मचाऱ्यांच्या/अधिकाऱ्यांच्या नजरेस ताबडतोब आणाव्यात व संबंधितांकडून विहित मुदतीत विकल्प प्राप्त झाल्यावर त्यांची सुधारित वेतननिश्चिती तात्काळ अंमलात आणावी.

४. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श. वि. लागवणकर,
शासनाचे उप सचिव,
वित्त विभाग.

(शा.म.मु.) एच १३०० (१४,०००-१०-९४)

प्रति

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्य मंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयीन सर्व विभाग, सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्रमांक २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.

---

*पत्राद्वारे

१९९४ चा क्रमांक
माहिती व मार्गदर्शनाकरिता प्रत रवाना